जिल्हा परिषदेच्या शिक्षकांच्या जिल्हांतर्गत बदल्यांसाठी सुधारित धोरण.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जिपब- ४८१७/प्र.क्र.७/आस्था-१४**
२५- मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट,
मुंबई-४०० ००१,
दिनांक : २७/०२/२०१७

वाचा -

१) शासन निर्णय क्रमांक जिपब-४१४/प्र.क्र.११२/आस्था-१४, दिनांक १५ मे, २०१४
२) शासन शुध्दीपत्रक क्र. जिपब४१४/प्र.क्र.११२/ आस्था-१४, दिनांक ०२ जुलै, २०१४
३) शासन शुध्दीपत्रक क्रं जिपब ४८१६/प्र.क्र १३६/आस्था-१४, दिनांक २ जानेवारी, २०१७

**प्रस्तावना** :--

यापूर्वी शासनाने संदर्भ क्रमांक १ च्या दिनांक १५ मे, २०१४ च्या शासन निर्णयान्वये तसेच संदर्भ क्रंमाक २ व ३ वरील अनुक्रमे दिनांक ०२/०७/२०१४ व दिनांक ०२/०१/२०१७ च्या शुध्दीपत्रकान्वये जिल्हा परिषदेच्या गट क (वर्ग-३) व गट ड ( वर्ग-४ ) च्या कर्मचाऱ्यांच्या जिल्हांतर्गत बदल्यांबाबत धोरण निश्चित केलेले आहे. सदर धोरणानुसार जिल्हा परिषदे अंतर्गत कार्यरत असणाऱ्या शिक्षकांच्याही जिल्हांतर्गत बदल्या करण्यात येत होत्या. परंतू शिक्षक संवर्गाची मोठी संख्या, त्यांचे इतर संवर्गापेक्षा असलेले कामाचे भिन्न स्वरुप लक्षात घेऊन, त्यांच्या बदलीबाबत स्वतंत्रपणे वेगळयाने विचार करावयाची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

२. शिक्षक संवर्गाचे नव्याने बदली धोरण निश्चित करताना शिक्षकांना केंद्रबिंदू मानून तसेच त्यांना काम करीत असताना उदभवणाऱ्या अडी-अडचणी विचारात घेऊन शिक्षकांचे बदली धोरण निश्चित करणे आवश्यक आहे.

**शासन निर्णय** :-

वरील बाबींचा विचार करुन शासनाने शिक्षकांच्या जिल्हांतर्गत बदली धोरणाबाबत नव्याने विचार करण्याचा निर्णय घेतला आहे. त्या अनुषंगाने वरील संदर्भाधीन अ.क्र.१ मधील दिनांक १५ मे, २०१४ च्या शासन निर्णयातून केवळ शिक्षक संवर्ग वगळण्यात येत आहे. आता जिल्हा परिषदेअंतर्गत कार्यरत शिक्षक संवर्गासाठी या शासन निर्णयाअन्वये खालीलप्रमाणे सुधारित धोरण निश्चित करण्यात येत आहे.

**I) व्याख्या :**

**(१) अवघड क्षेत्र** :- सर्वसाधारणपणे जे क्षेत्र तालुका मुख्यालयापासून दूर आहे, दळणवळणाच्या दृष्टीने त्या शाळेत अथवा गावात पोहोचण्यास सोईसुविधा नाहीत, दुर्गम व डोंगराळ भागातील गावे तसेच काम करण्यास प्रतिकूल परिस्थिती असलेली गावे ही अवघड क्षेत्रे म्हणून निश्चित करण्यात येतील. अवघड क्षेत्र निश्चितीची कार्यवाही करताना मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्यामार्फत तालुक्यातील सर्वसाधारण तसेच भौगोलिक परिस्थितीचा विचार करुन निर्णय घेण्यात येईल.

**(२) सर्वसाधारण क्षेत्र** : वरील अवघड क्षेत्रात न मोडणारी गावे ही सर्वसाधारण क्षेत्रात मोडतील.

**(३) बदली वर्ष-** ज्या कॅलेंडर वर्षाच्या दिनांक ३१ मे पर्यन्त बदल्या करावयाच्या आहेत ते वर्ष.

**(४) बदलीसाठी निश्चित धरावयाची सेवा :** अवघड क्षेत्र निहाय व सर्वसाधारण क्षेत्रनिहाय बदली वर्षाच्या दिनांक ३१ मे पर्यन्त पूर्ण झालेली एकूण सलग सेवा.

**(५) शिक्षक** – या शासन निर्णयाच्या प्रयोजनार्थ शिक्षक म्हणजे जिल्हा परिषदेतंर्गत कार्यरत असलेले प्राथमिक / माध्यमिक/पदवीधर शिक्षक, मुख्याध्यापक व केंद्र प्रमुख.

**(६) सक्षम प्राधिकारी** – शिक्षकांच्या बदल्यांसाठी जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी हे सक्षम प्राधिकारी असतील

**(७) बदल्यांचे अधिकार प्राप्त शिक्षक** - बदल्यांचे अधिकार प्राप्त शिक्षक म्हणजे ज्या शिक्षकांची अवघड क्षेत्रात बदलीसाठी निश्चित धरावयाची सेवा ३ वर्षापेक्षा जास्त झाली असेल असे शिक्षक.

**(८) विशेष संवर्ग शिक्षक भाग-१** :- खाली नमूद संवर्गाचे शिक्षक हे **<u>विशेष संवर्ग शिक्षक भाग-१</u>** म्हणून गणले जातील.

(अ) पक्षाघाताने आजारी कर्मचारी (Paralysis)

(आ) अपंग कर्मचारी (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या शा.नि.दिनांक १४.०१.२०११ मधील नमूद प्रारुपाप्रमाणे प्रमाणपत्र आवश्यक), मतिमंद मुलांचे व अपंग मुलांचे पालक

(इ) हृदय शस्त्रक्रिया झालेले कर्मचारी

(ई) जन्मापासून एकच मुत्रपिंड (किडनी) असलेले/मुत्रपिंड रोपण केलेले कर्मचारी/डायलिसीस सुरु असलेले कर्मचारी

(उ) कॅन्सरने (कर्करोग) आजारी कर्मचारी

(ऊ) <u>आजी/माजी</u> सैनिक व अर्धसैनिक जवानांच्या पत्नी / विधवा

(ए) विधवा कर्मचारी

(ऐ) कुमारिका कर्मचारी

(ओ) परित्यक्ता/घटस्फोटीत <u>महिला</u> कर्मचारी

(औ) वयाची ५३ वर्षे पूर्ण केलेले कर्मचारी

**<u>(९) विशेष संवर्ग शिक्षक भाग-२</u>**

पती-पत्नी एकत्रिकरण (जर सध्या दोघांच्या नियुक्तीचे ठिकाण एकमेकांपासून ३० कि.मी.पेक्षा जास्त अंतरावर असल्यास त्यांना विशेष संवर्ग शिक्षकांचा दर्जा प्राप्त होईल)

अ) पती पत्नी दोघेही जिल्हा परिषद कर्मचारी असतील तर,

ब) पती पत्नी दोघांपैकी एक जिल्हा परिषद कर्मचारी व दुसरा राज्य शासकीय कर्मचारी असेल तर,

क) पती पत्नी दोघांपैकी एक जिल्हा परिषद कर्मचारी व दुसरा केंद्र शासकीय कर्मचारी असेल तर,

ड) पती पत्नी दोघांपैकी एक जिल्हा परिषद कर्मचारी व दुसरा राज्य शासनाच्या स्वायत्त संस्थेचा कर्मचारी असेल तर, उदा. महानगरपालिका/ नगरपालिका,

इ) पती पत्नी दोघांपैकी एक जिल्हा परिषद कर्मचारी व दुसरा राज्य अथवा केंद्र शासनाच्या सार्वजनिक उपक्रमातील कर्मचारी,

ई) पती पत्नी दोघांपैकी एक जिल्हा परिषद कर्मचारी व दुसरा शासन मान्यता प्राप्त संस्थेतील कर्मचारी असेल तर,

**(१०) बदलीस पात्र शिक्षक** - बदलीपात्र शिक्षक म्हणजे ज्या शिक्षकांची बदलीसाठी निश्चित धरावयाची सेवा १० वर्ष पूर्ण झाली आहे असे शिक्षक.

**II) <u>शिक्षकांची जिल्हांतर्गत बदल्यांसाठी आवश्यक माहिती प्रसिध्द करणे.</u>**

१. <u>जिल्हयांतील अवघड क्षेत्र घोषित करणे-</u> उपरोक्त नमूद केल्यानुसार शिक्षकांच्या बदल्या करण्यासाठी प्रथमत: मुख्य कार्यकारी अधिकारी हे जिल्हयातील तालुकानिहाय प्रत्येक गावाचे अवघड क्षेत्र व सर्वसाधारण

क्षेत्र अशा दोन भागात विभागणी करतील. अशी विभागणी केल्यावर अवघड क्षेत्रात येणाऱ्या शाळांची व सर्व साधारण क्षेत्रातील शाळांची यादी प्रसिध्द करतील.

२. <u>शाळानिहाय रिक्त जागा घोषित करणे</u> :-

- मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांकडून जिल्हयातील अपेक्षित रिक्त जागांची स्थिती सुनिश्चित करण्यात येईल. ही कार्यवाही करीत असताना प्रथमत: मा. उच्च न्यायालयाच्या रिट याचिका क्रं ३२७८/२०१० बाबत दि.१३/०९/२०१२ व दि. २१/११/२०१२ रोजी दिलेल्या आदेशाच्या अनुषंगाने आदिवासी / नक्षलग्रस्त क्षेत्रातील सर्व जागा भरण्याची कार्यवाही करणे अपेक्षित असल्याने या भागातील रिक्त जागा "निरंक" करण्यात याव्यात. त्यानंतर जिल्हयातील अपेक्षित रिक्त जागांची स्थिती तालुकानिहाय व शाळानिहाय, शक्यतो समप्रमाणात सुनिश्चित करण्यात येईल.
- अशाप्रकारे शाळानिहाय ठेवावयाच्या रिक्त पदांची यादी मुख्य कार्यकारी अधिकाऱ्यांकडून जाहीर करण्यात येईल.
- शिक्षकांच्या बदल्या करत असताना ठेवावयाच्या रिक्त जागांवर बदलीने नियुक्ती दिली जाणार नाही.

३. <u>शिक्षकांच्या याद्या प्रसिध्द करणे</u> :-

- शिक्षणाधिकारी प्रथमत: प्रतिवर्षी बदलीस पात्र शिक्षकांच्या (सर्वसाधारण तसेच अवघड क्षेत्र) यादया प्रसिध्द करतील.
- उपरोक्त नमूद यादयांबाबत आक्षेप असल्यास यादया प्रसिध्द झाल्या पासुन सात दिवसात शिक्षणाधिकाऱ्यांकडे यादयांमधील दुरुस्तीसाठी संबधित शिक्षकास अर्ज करता येईल. या अर्जावर शिक्षणाधिकारी हे पुढील सात दिवसात निर्णय घेतील. शिक्षणाधिकाऱ्यांच्या निर्णयांने संबधित शिक्षकाचे समाधान न झाल्यास, त्याबाबतचे अपील मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे करता येईल. अपील करण्याचा कालावधी हा पाच दिवसाचा असेल. सदर अपीलावर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी घेतलेला निर्णय अंतिम असेल.

<u>III) शिक्षकांकडून बदलीसाठी पसंती क्रम घेणे</u> –

- बदलीस पात्र शिक्षक यांच्याकडून जिल्हयातील २० शाळांचा पसंतीक्रम त्यांच्या बदलीने द्यावयाच्या नेमणूकीसाठी मागविण्यात यावा. (सोबतच्या विवरणपत्रानुसार`) –

  बदलीस पात्र शिक्षकांची बदली होणारच असे बंधनकारक नाही. मात्र वरील प्रमाणे पसंतीक्रम देताना बदली होत असल्यास त्या पसंतीक्रमानुसार बदली द्यावी किंवा बदली होणे बंधनकारक नसले तरीही या पसंतीक्रमानुसार विनंतीने बदली करण्याचा विनंती अर्ज या विवरणपत्रात नमूद आहे.
- बदली अधिकार पात्र शिक्षकांना बदली हवी असल्यास त्यांनी जिल्हयातील २० शाळांचा पसंतीक्रम त्यांना बदलीने द्यावयाच्या नेमणूकीसाठी देणे आवश्यक राहील. (सोबतच्या विवरणपत्रा नुसार)
  - अ) विशेष संवर्ग शिक्षक भाग १ मधील शिक्षकांना बदली हवी असल्यास किंवा बदलीस पात्र यादीत नाव असताना बदली नको असल्यास त्यांनी सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे अर्ज करावा.
  - आ) विशेष संवर्ग शिक्षक भाग २ शिक्षकांना बदली हवी असल्यास किंवा बदलीस पात्र यादीत नाव असताना बदली नको असल्यास, त्यांनी सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे अर्ज करावा.
- बदलीस पात्र शिक्षकांनी उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे पसंती क्रम न दिल्यास किंवा त्यांना त्यांच्या पसंतीप्रमाणे बदली देणे शक्य नसल्यास त्यांची बदली उपलब्ध असणाऱ्या पदावर करण्यात येईल.

<u>IV) बदली प्रक्रिया कार्यपध्दती :-</u>

<u>टप्पा क्र. १ :-</u>

- ज्या शाळांमध्ये, ठेवावयाच्या रिक्त पदांपेक्षा कमी पदे रिक्त असल्यास, अशा शाळांमध्ये जर बदलीस पात्र शिक्षक असतील तर अशा शिक्षकांची बदली त्या शाळेतून करण्यात येईल.

<u>उदा.</u>

एखाद्या शाळेत १० शिक्षकांचा मंजूर आकृतीबंध आहे. मुद्दा क्रमांक- II (२) नुसार या शाळेमध्ये शिक्षकांच्या तीन जागा रिक्त ठेवावयाच्या आहेत. सद्य:स्थितीत या शाळेत एकच पद रिक्त आहे. त्यामुळे आणखी दोन शिक्षकांची पदे रिक्त ठेवणे आवश्यक आहे.

**अ)** या शाळेत तीन बदली पात्र शिक्षक आहेत. अशा वेळी तेथील दोन बदली पात्र शिक्षकांची बदलीसाठी निश्चीत धरावयाच्या सेवेच्या सेवाजेष्ठतेनुसार बदली करण्यात येईल व अशा पध्दतीने मुद्दा क्रमांक दोन नुसार तीन जागा रिक्त ठेवण्यात येतील.

**ब)** उपरोक्त नमूद उदाहरणामध्ये तिस-या बदलीपात्र शिक्षकाच्या जागेवर एखाद्या बदली अधिकार प्राप्त शिक्षकाने प्राधान्यक्रम दर्शविल्यास त्या तिस-या बदली पात्र शिक्षकाची बदली करण्यात येऊन त्या जागी बदली अधिकार प्राप्त शिक्षकाला नियुक्ती देण्यात येईल.

**क)** शाळेत एकच बदली पात्र शिक्षक आहे. अशावेळी त्या एका शिक्षकाची बदली होईल व एकूण दोन पदे त्या शाळेत रिक्त राहतील.

१) **<u>टप्पा क्र. २ :-</u>** **<u>विशेष संवर्ग शिक्षक भाग-१ यांच्या बदल्या</u>** **:-**

- टप्पा क्र. १ प्रमाणे कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर विशेष संवर्ग शिक्षक भाग-१ यांच्या बदल्या करण्यात येतील.
- विशेष संवर्ग शिक्षकांना केवळ त्यांच्या विनंतीवरुनच बदली देण्यात येईल. ज्या विशेष संवर्गामधील शिक्षकांना बदली नको असेल मात्र त्यांचे नाव बदलीस पात्र शिक्षकांच्या यादीत आले असल्यास, त्यांनी सोबत जोडलेल्या विवरण पत्र क्रं ३ मध्ये स्वयंघोषीत प्रमाणपत्र देणे आवश्यक राहील.
- विशेष संवर्गांतर्गत विनंती बदलीसाठीचा प्राधान्यक्रम हा विशेष संवर्ग शिक्षकांच्या वरील व्याख्येमध्ये नमूद केलेल्या क्रमवारीनुसार राहील.
- एखाद्या विशिष्ट संवर्गामध्ये अनेक कर्मचाऱ्यांनी विनंती बदली मागितल्यास त्यांच्या सेवा जेष्ठता विचारात घेऊन जेष्ठ कर्मचाऱ्यांस प्रथमत: बदली अनुज्ञेय राहील.
- सेवा जेष्ठता समान असल्यास वयाने जेष्ठ असणाऱ्या कर्मचाऱ्यास प्राधान्याने बदली अनुज्ञेय राहील.
- या संवर्गातील शिक्षकांच्या बदल्यांसाठी प्राधान्यक्रमानुसार यादी तयार करण्यात येईल.

या यादीच्या आधारे बदली करताना, शिक्षकांचा पसंतीक्रम विचारात घेऊन ज्या शाळांमध्ये बदलीस पात्र शिक्षक उपलब्ध असतील त्या शाळेत प्राधान्यानुसार शिक्षकांची बदली करण्यात येईल. जर एखाद्या विशेष संवर्ग शिक्षकाला त्याच्या पसंतीक्रमाप्रमाणे एकाही शाळेमध्ये (तेथे बदलीस पात्र शिक्षक उपलब्ध नसल्याने) बदली देता आली नाही तर त्याची बदली होणार नाही.

**<u>टप्पा क्र. ३ :-</u>** **<u>विशेष संवर्ग शिक्षक भाग-२ यांच्या बदल्या</u>** **:-**

टप्पा क्र. २ प्रमाणे कार्यवाही झाल्यानंतर विशेष संवर्ग शिक्षक भाग २ यांच्या बदल्या करण्यात येतील. जे शिक्षक विशेष संवर्ग शिक्षक भाग २ मध्ये मोडतात त्यांनी विवरणपत्र क्रं. ४ मधील नमुन्यात **<u>स्वयंघोषीत प्रमाणपत्र</u>** सादर करणे आवश्यक आहे.

जर दोघेही जिल्हा परिषदेमध्ये शिक्षक असतील दोघापैकी एकच, या संवर्गासाठी अर्ज करु शकेल आणि त्यांनी पसंती क्रमाच्या जागामधुन ३० कि.मी अंतरापर्यंत शाळेचा पसंतीक्रम देणे आवश्यक आहे.

उपरोक्त प्रमाणे पती पत्नी एकत्रीकरण झाल्यावर संबधित कर्मचाऱ्यांच्या बदलीसाठी या शासन निर्णयातील नमूद केलेल्या कार्यपध्दती लागु होतील. या तरतुदींप्रमाणे संबंधितांची बदली पात्र सेवा झाल्यानंतर त्यांची पुढील

बदली करताना उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे त्यांना एक एकक ( one unit ) मानुन बदलीने नियुक्ती देता येईल. पर्यायाने ज्या ठिकाणी दोन जागा रिक्त असतील अशा ठिकाणी अन्यथा ३० कि.मी. परिसरात दोन जागा रिक्त असतील अशा ठिकाणी त्यांची बदली केली जाईल. जर दोघे पती पत्नी जिल्हा परिषदेमध्ये शिक्षक असतील तर एकत्रीकरण झाल्यानंतर त्या दोघांना एक एकक म्हणून विचारात घ्यावयाचे आहे. यापैकी एकाची पण १० वर्ष सलग सेवा झाली असल्यास दोघांना बदलीस पात्र धरण्यात येईल.

**<u>टप्पा क्र.४ :-</u> १) <u>बदली अधिकार प्राप्त शिक्षकांच्या बदल्या</u> :-**

- टप्पा क्रं ३ प्रमाणे कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर बदली अधिकार प्राप्त शिक्षकांच्या बदल्या करण्यात येतील.
- यासाठी ज्या बदली अधिकार प्राप्त शिक्षकांची तीन वर्षांची बदलीसाठी निश्चित धरावयाची सेवा पुर्ण झाली असेल अशा शिक्षकांनी बदलीसाठी विवरणपत्र-१ मध्ये अर्ज करणे आवश्यक आहे.
- सदर कर्मचाऱ्यांच्या बदल्या हया त्यांच्या बदलीसाठी पात्र धरावयाच्या सेवाजेष्ठतेनुसार करण्यात येतील.
- सेवाजेष्ठता समान असल्यास वयाने ज्येष्ठ असणाऱ्यां कर्मचाऱ्यास बदली अनुज्ञेय राहील
- “बदली अधिकार पात्र शिक्षकांच्या” बदल्या हया “बदलीस पात्र शिक्षकांच्या” जागेवर त्यांच्या विनंतीतील प्राधान्यक्रमानुसार केल्या जातील.
- बदली अधिकार प्राप्त शिक्षकांनी जर बदलीसाठी पसंतीक्रम दिला नाही आणि जर हे **<u>शिक्षक बदलीस पात्र नसतील तर</u>** त्यांची बदली होणार नाही.

**<u>टप्पा क्र. ५ :- बदलीस पात्र शिक्षकांची बदली करण्याची कार्यपध्दती</u> :-**

- टप्पा क्रं १, २, ३ व ४ मध्ये नमुद केलेल्या कार्यपध्दतीमुळे, बदली होत असलेले व बदलीस पात्र शिक्षक व ज्या शिक्षकांनी बदलीची विनंती केली आहे त्या सर्वाची एक ज्येष्ठता यादी, जिल्हा परिषदेतील एकुण सेवा विचारात घेऊन करण्यात येईल.
- **सेवाजेष्ठता समान असल्यास वयाने ज्येष्ठ असणाऱ्यां कर्मचाऱ्यास बदली प्राधान्याने अनुज्ञेय राहील.**
- या यादीतील शिक्षकांच्या त्यांच्या प्राध्यान्यक्रमाने व त्यांच्या पसंतीनुसार बदल्या करण्यात येतील. परंतु ह्या शिक्षकांची बदली ही ते ज्या शाळेत जाण्यास इच्छुक आहेत त्या शाळेत, ठेवावयाच्या रिक्त जागा सोडुन, अन्य रिक्त जागा असतील त्याच रिक्त पदांवर किंवा त्यापेक्षा सेवाज्येष्ठतेने कनिष्ठ असलेल्या बदलीस पात्र शिक्षकांच्या जागेवर, बदली होऊ शकते.
- या शिक्षकांनी पसंती प्राधान्यक्रम न दिल्यास किंवा त्यांच्या प्राधान्यक्रमाप्रमाणे जागा उपलब्ध नसल्यास व वरील प्रमाणे बदली होत असल्यास उपलब्ध होणाऱ्या पदावर त्यांची बदलीने नियुक्ती केली जाईल.

**<u>टप्पा क्र. ६ :- कार्यमुक्तीचे आदेश :</u>**

बदलीने पदस्थापनेचे आदेश निर्गमित करताना त्यात कार्यमुक्तीचा दिनांक नमूद करण्यात यावा. कार्यमुक्तीच्या दिनांकानंतर ते बदली होण्यापूर्वी ज्या ठिकाणी कार्यरत होते त्या ठिकाणावरुन त्यांचे वेतन अथवा कोणतीही देयके अदा करु नयेत. बदलीनंतर संबंधित कर्मचारी बदलीच्या ठिकाणी रुजू होत नसेल तर अशा कर्मचाऱ्याविरुध्द मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी नियमानुसार शिस्तभंगाची कारवाई करावी.

**<u>V) इतर धोरणात्मक बाबी :</u>**

१) बदली ही संपूर्णपणे प्रशासकीय स्वरुपाची बाब असल्यामुळे कोणत्याही कर्मचाऱ्याने राजकीय दबाव वापरल्यास महाराष्ट्र जिल्हा परिषदा, जिल्हा सेवा (वर्तणूक) नियम, १९६७ मधील नियम ६ (५) चा भंग केला म्हणून ती कृती शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहील.

२) विनंती बदल्यांसाठी कोणतेही भत्ते व पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

३) प्रशासकीय अथवा विनंती बदली झालेल्या कर्मचाऱ्यांना तात्पुरती प्रतिनियुक्ती अशा मार्गाने त्यांच्या पूर्वीच्या नियुक्तीच्या ठिकाणी किंवा कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक सोयीसाठी इतरत्र पदस्थापना देऊ नये. या प्रकारचा प्रयत्न बदलीतील अवैधता/अनियमितता समजून संबंधित अधिकारी शिस्तभंग कार्यवाहीस पात्र होतील.

४) जिल्हा परिषद कर्मचाऱ्यांच्या बदल्या सामान्यपणे वर्षातून एकदाच दिनांक १ मे ते ३१ मे पर्यंत करण्यात याव्यात.

५) काही शिक्षकांनी त्यांच्या जिल्हांतर्गत बदल्यासंदर्भात मा. उच्च वा सक्षम न्यायालयात, दावा दाखल केला असल्यास अशा प्रकरणात मा. उच्च न्यायालय वा सक्षम न्यायालयाने दिलेल्या आदेशाची सर्वप्रथम अंमलबजावणी करावी व तदनंतर या शासन निर्णयानुसार जिल्हांतर्गत बदल्याबाबत पुढील कार्यवाही सुरू करावी.

उदा. अमरावती जिल्हा परिषदेअंतर्गत काही कार्यरत शिक्षकांनी मा. उच्च न्यायालय मुंबई, नागपूर खंडपीठ येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र. ६०७६/२०१६ मध्ये मा. न्यायालयाने दि. ५/१२/२०१६ रोजी दिलेल्या निर्णयानुसार मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, अमरावती यांनी कार्यवाही करावी. वरील निर्णयानुसार कार्यवाही करण्यास या शासन निर्णयानुसार कोणतीही बाधा येत नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०७१२२३२७३९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.02.28 11:21:09 +05'30'

**( असीम गुप्ता )**

**सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल महोदय यांचे सचिव, मलबार हिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३) मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री ग्रामविकास, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
४) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५) सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय , मुंबई
६) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई
७) सर्व अपरमुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
८) सर्व विभागीय आयुक्त
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१०) उपायुक्त (आस्थापना) विभागीय आयुक्त कार्यालये (सर्व विभाग)
११) माहिती व जनसंपर्क संचालनालय यांना प्रसिध्दीसाठी अग्रेषित.
१२) सर्व कार्यासने, ग्रामविकास विभाग
१३) निवड नस्ती कार्या क्र.आस्था-१४, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

## विवरण पत्र-१
## बदलीस पात्र शिक्षक

१. शिक्षकाचे नाव :
२. जिल्हा परिषदेत शिक्षक पदावर रुजु झाल्याचा दिनांकः-
३. सध्या कार्यरत असलेल्या शाळेचा पत्ता :
४. सध्याच्या शाळेत कधीपासून कार्यरत आहेत ती तारीख :
५. जन्मदिनांक :
६. संवर्ग / पदनाम :
७. बदलीस पात्र शिक्षकांचे घोषीत यादीतील क्रमांक : **

शाळांचा प्राधान्यक्रम: खालील नमूद अ आणि आ या पर्यायापैकी एक पर्याय निवडण्यात यावा. कोणताही पर्याय न निवडल्यास प्रशासकिय बदली साठी संबंधीत कर्मचारी पात्र राहील.

अ- मला बदली नको असून प्रशासकीय बाबीमुळे माझी बदली होत असल्यास, बदलीने नियुक्तीसाठी माझा खालील प्रधान्यक्रम विचारात घ्यावा. ☐

किंवा

आ- मला बदली हवी असून विनंतीने बदलीसाठी माझा, खालील प्रधान्यक्रम विचारात घ्यावा. ☐

| अ.क्र. | शाळेचे नाव गाव व तालुका |
|---|---|
| १. | |
| २. | |
| ३. | |
| ४. | |
| ५. | |
| ६. | |
| ७. | |
| ८. | |
| ९. | |
| १०. | |
| ११. | |
| १२. | |

| | |
|---|---|
| १३. | |
| १४. | |
| १५. | |
| १६. | |
| १७. | |
| १८. | |
| १९. | |
| २०. | |

वरील माहिती चुकीची आढळल्यास मी शिस्तभंग कारवाईस पात्र राहीन.

अर्जदाराची स्वाक्षरी
नाव व पदनाम

# विवरण पत्र-२
# बदली अधिकार प्राप्त शिक्षक

१. शिक्षकाचे नाव :
२. जिल्हा परिषदेत शिक्षक पदावर रुजु झाल्याचा दिनांक
३. जन्मदिनांक :
४. संवर्ग / पदनाम :
५. सेवेचा तपशिल

अवघड क्षेत्रातील संलग सेवेचा तपशिल :

| शाळा | कधीपासून | कधीपर्यंत |
|---|---|---|
| | | |
| | | |
| | | |

६. बदलीने नियुक्तीसाठी शाळांचा प्राधान्यक्रम :

| अ.क्र. | शाळेचे नाव गाव व तालुका |
|---|---|
| १. | |
| २. | |
| ३. | |
| ४. | |
| ५. | |
| ६. | |
| ७. | |
| ८. | |
| ९. | |
| १०. | |
| ११. | |
| १२. | |
| १३. | |
| १४. | |
| १५. | |
| १६. | |
| १७. | |

| | |
|---|---|
| १८. | |
| १९. | |
| २०. | |

९. उपरोक्त प्राधान्यक्रमांचा माझ्या विनंती बदलीसाठीही विचार व्हावा.

वरील माहिती चुकीची आढळल्यास मी शिस्तभंग कारवाईस पात्र राहीन. ☐

अर्जदाराची स्वाक्षरी नाव व पदनाम

# विवरण पत्र-३
# विशेष संवर्ग शिक्षक भाग-१

१. शिक्षकाचे नाव :
२. जिल्हा परिषद सेवेत रुजू झाल्याचा दिनांक :
३. सध्या कार्यरत असलेल्या शाळेचा पत्ता :
४. सध्याच्या शाळेत कधीपासून कार्यरत आहेत (तारीख) :
५. जन्मदिनांक :
६. संवर्ग / पदनाम :
७. विशेष संवर्गाचा प्रकार :
८. बदली पात्र यादी मध्ये माझे नाव आलेले असून मी विशेष संवर्गाचा असल्यामुळे मला बदलीतून सूट मिळावी. ☐

( विशेष संवर्ग शिक्षक भाग-१ नुसार पात्र असणाऱ्या शिक्षकांचे नाव बदली पात्र शिक्षकांच्या यादीत आल्यास आणि सदर शिक्षक बदलीसाठी इच्छूक नसल्यास त्या शिक्षकांनी उपरोक्त चौकानात बरोबरची खूण करावी.)

किंवा

विनंती बदलीसाठी शाळांचा प्राधान्यक्रम :

| अ.क्र. | शाळेचे नाव गाव व तालुका |
|---|---|
| १. | |
| २. | |
| ३. | |
| ४. | |
| ५. | |
| ६. | |
| ७. | |
| ८. | |
| ९. | |
| १०. | |
| ११. | |
| १२. | |
| १३. | |
| १४. | |
| १५. | |

| | |
|---|---|
| १६. | |
| १७. | |
| १८. | |
| १९. | |
| २०. | |

वरील माहिती चुकीची आढळल्यास मी शिस्तभंग कारवाईस पात्र राहीन.

अर्जदाराची स्वाक्षरी नाव व पदनाम

# विवरण पत्र-४

## विशेष संवर्ग शिक्षक भाग-२

१. शिक्षकाचे नाव :

२. जिल्हा परिषद सेवेत रुजू झाल्याचा दिनांक :

३. सध्या कार्यरत असलेल्या शाळेचा पत्ता :

४. सध्याच्या शाळेत कधीपासून कार्यरत आहेत (तारीख) :

५. जन्मदिनांक :

६. संवर्ग / पदनाम :

७. विशेष संवर्गाचा प्रकार :- पती पत्नी एकत्रीकरण ( सद्याचे पदस्थापनेमधील अंतर ---- कि.मी.)

८. जोडीदार कार्यरत असल्याचा तपशिल ( जोडीदाराचे नाव, कार्यरत आस्थापनेचे नाव, पदनाम, कार्यालयाचा पत्ता.

---------------------------------

---------------------------------

---------------------------------

-----------------------------------

९. विनंती बदलीसाठी शाळांचा प्राधान्यक्रम :

| अ.क्र. | शाळेचे नाव गाव व तालुका |
|---|---|
| १. | |
| २. | |
| ३. | |
| ४. | |
| ५. | |
| ६. | |
| ७. | |
| ८. | |
| ९. | |
| १०. | |
| ११. | |
| १२. | |
| १३. | |
| १४. | |
| १५. | |

| | |
|---|---|
| १६. | |
| १७. | |
| १८. | |
| १९. | |
| २०. | |

९. उपरोक्त प्राधान्यक्रमांचा माझ्या विनंती बदलीसाठी विचार व्हावा. ☐

१०. उपरोक्त नमूद प्राधान्य क्रमामधील शाळा या जोडीदाराच्या आस्थापनेच्या ठिकाणापासून ३० कि. मी . अंतराच्या आत असल्याचे मी प्रमाणित करीत आहे.

वरील माहिती चुकीची आढळल्यास मी शिस्तभंग कारवाईस पात्र राहीन.

अर्जदाराची स्वाक्षरी नाव व पदनाम

टीप-

१) पती व पत्नी दोघे जिल्हा परिषदेमध्ये शिक्षक असतील तर त्यापैकी एकानेच अर्ज करावा. दुसऱ्या जोडीदाराचे नाव जर बदलीस पात्र शिक्षकांचे यादीत समाविष्ट असल्यास त्यांचे नाव या यादीतून कमी करण्यात येईल.

२) पती व पत्नी यांचे सद्याचे पदस्थापनेमधील अंतर ३० कि.मी. पेक्षा असल्यास त्यांना विशेष संवर्गाचा दर्जा प्राप्त होणार नाही याची नोंद घ्यावी.